ट्रामा केअर युनिट, चांदवड, जि.नाशिक
येथील ९ अस्थाई पदांना मुदतवाढ
देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदआ २०१७/ प्र.क्र.६१/ आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २५ मार्च, २०१७

वाचा -

१) **शासन निर्णय , सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक- पदआ २०१६/प्र.क्र.४२/आरोग्य-३, दिनांक- २४.१०.२०१६.**
२) **आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३ /टे-५/ उपजिरु चांदवड /अपदे/सन २०१७-१७/२१३१-३२/१७, दिनांक- १७.०२.२०१७.**

**शासन निर्णय-**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अधिपत्याखालील ट्रामा केअर युनिट चांदवड, जि.नाशिक येथील ८ अस्थाई पदांना दि.०१.१०.२०१६ ते दि.२८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार ट्रामा केअर युनिट, चांदवड, जि.नाशिक येथील मंजूर असलेल्या ९ अस्थाई पदांना दि.०१.०३.२०१७ ते दि.३०.०९.२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१७- २०१८ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०३ - ग्रामिण आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११० - १ - इतर रुग्णालये व दवाखाने
(०१)(०१) - कुटीर रुग्णालये (२२१० ०३१५)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दिनांक - १०.०२.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२२१७१४२००११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.03.25 13:13:22 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. संचालक, आरोग्यसेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा(राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा(आरोग्य), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, नाशिक.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
८. वैद्यकीय अधिक्षक, ट्रामा केअर युनिट, चांदवड, जि.नाशिक.
९. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३)

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक-पदआ-२०१७ /प्र.क्र.६१/ आरोग्य-३,
विवरणपत्र.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी व ग्रेड पे (रुपये) | अस्थाई पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | अस्थिव्यंग शल्यचिकित्सक, वर्ग-२ | १५६००-३९१०० (ग्रेड पे ५४०० ) | १ |
| २ | बधिरीकरण शास्त्रज्ञ, वर्ग-२ | १५६००-३९१०० (ग्रेड पे ५४०० ) | २ |
| ३ | वैद्यकीय अधिकारी, वर्ग-२ | १५६००-३९१०० (ग्रेड पे ५४०० ) | २ |
| ४ | परिसेविका, वर्ग-३ | ९३००-३४८०० (ग्रेड पे ४३०० ) | १ |
| ५ | अधिपरिचारीका, वर्ग-३ | ९३००-३४८०० (ग्रेड पे ४२०० ) | ३ |
| **एकूण** | | | **९** |